दर्शनिका विभाग, मुंबई- यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दर्शनि - २०२०/ प्र.क्र.३१/सांका.-२.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ फेब्रुवारी, २०२०.

संदर्भ : १. वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र. १२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४.१०.२००४.
२. समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्र. संकीर्ण-२००१/प्र.क्र. २९८/सां.का.२, दि. २३.३.२००६ व शुध्दीपत्रक, दि. ५.५.२००६.
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. ११.०९.२०१९.
४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. दर्शनि- २०१९/प्र.क्र.३०/सां.का.२, दि. २३.०९.२०१९.
५. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग यांचे पत्र क्र. दर्श -१५-१८२,१८१ दि. १५.०२.२०२०.
६. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १२.०२.२०२०.

**शासन निर्णय :**

या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील दर्शनिका विभागाच्या आस्थापनेवरील १०+४ एकूण १४ अस्थायी पदे दि. १.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र. ४ येथील दि. २३.०९.२०१९ च्या शासन निर्णयानुसार मंजूरी देण्यात आली होती. आता कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये त्यांच्या आस्थापनेवरील १०+४ एकूण १४ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रस्ताव सादर केला आहे. संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयानुसार वित्त विभागाने अस्थायी पदांना दि. १.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान केले आहेत. दर्शनिका विभागाकडून प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील अटींच्या अधीन राहून दर्शनिका विभागातील सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या १०+४ एकूण १४ अस्थायी पदांना दि. १.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे:-

१) ज्या प्रयोजनार्थ ही पदे निर्माण केली आहेत त्याच प्रयोजनार्थ त्या पदाचा विनियोग करण्यात यावा.
२) या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही.
३) या पदांवरील अपेक्षित खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. विवरणपत्र “१” येथे नमूद केलेल्या पदांवर होणारा खर्च “मागणी क्र. झेडडी-१, २०७० इतर प्रशासकीय सेवा (००) ८०० इतर खर्च, (००) (०१) महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका संपादक मंडळ (२०७० ०७९१) ०१ वेतन” व विवरणपत्र “२” येथे नमूद केलेल्या पदांवर होणारा खर्च “मागणी क्र. झेडडी-१, २२२०, माहिती व प्रसिध्दी, (६०), इतर (००) ११० प्रकाशने (०१) (०१) भारतीय स्वतंत्र आंदोलन इतिहास समिती, महाराष्ट्र राज्य (२२२० ०४९१)-०१ वेतन” , या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर केलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा. वित्त विभाग शासन निर्णय दि. १२.०२.२०२० अन्वये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने योग्य ती कार्यवाही करावी.

**३.** हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क.१२ (भाग-२)/२००४/ वित्तीय सुधाराणा-१, दि. ४.१०.२००४ व वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२७१२४६२६२३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2020.02.27 15:52:24 +05'30'

**( बाळसाहेब ईश्वर सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई.
२. महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
५. वित्त विभाग , मंत्रालय,मुंबई.
६. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती -सां.का.२.

**दर्शनिका विभाग, मुंबई अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत...**

शासन निर्णय क्रमांक- दर्शनि-२०२०/प्र.क.३१/सां.का.२ दि. २७ फेब्रुवारी, २०२० चे सहपत्र.

**विवरणपत्र-१**

| अ.क्र. | पद | संख्या | वेतनस्तर |
|---|---|---|---|
| १. | संशोधन अधिकारी | २ | S-१५, रु. ४१८००-१३२३०० |
| २. | सहाय्यक संशोधन अधिकारी | ४ | S-१४, रु. ३८६००-१२२८०० |
| ३. | मराठी टंकलेखक | ३ | S-६, रु. १९९००-६३२०० |
| ४. | शिपाई | १ | S-१, रु. १५०००-४७६०० |
| | **एकूण पदे** | **१०** | |

**विवरणपत्र-२**

| अ.क्र. | पद | संख्या | वेतनस्तर |
|---|---|---|---|
| १. | अधीक्षक | १ | S-१४, रु. ३८६००-१२२८०० |
| २. | सहाय्यक संशोधन अधिकारी | २ | S-१४, रु. ३८६००-१२२८०० |
| ३. | इंग्रजी टंकलेखक | १ | S-७, रु. २१७००-६९१०० |
| | **एकूण पदे** | **४** | |

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2020.02.27 15:52:50 +05'30'

**( बाळसाहेब ईश्वर सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**